**राज्यातील अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात**
**अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी तंत्रनिकेतन**
**संस्था स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्याक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२००९/प्र.क्र. २२२/०९/का.७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ५ फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांमध्ये व्यवसायाभिमुख व तांत्रिक शिक्षणाच्या अभावामुळे निर्माण झालेली बेरोजगारीची समस्या विचारात घेता, त्यांना तांत्रिक शिक्षण उपलब्ध करुन देऊन स्वयंरोजगारासाठी प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. राज्यात कार्यरत असलेल्या शासकीय व खाजगी तंत्रनिकेतनांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांचे अत्यल्प प्रमाण विचारात घेऊन, राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागात अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरीता नवीन खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांना तांत्रिक शिक्षण देऊन त्यांना रोजगारक्षम बनविण्याच्या उद्देशाने राज्यातील मालेगांव (जि. नाशिक), भिवंडी (जि. ठाणे) व मुंबई येथे प्रत्येकी एक याप्रमाणे तीन नवीन खाजगी तंत्रनिकेतन संस्था सुरु करण्यासाठी अशासकीय शैक्षणिक संस्थांना आर्थिक मदत देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. याकरिता कायम विनाअनुदानित तत्वावर तंत्रनिकेतन स्थापन करणाऱ्या व चालवू इच्छिणाऱ्या नामांकित अशासकीय अल्पसंख्याक (मुस्लिम, बौध्द, ख्रिश्चन, जैन, शीख व पारसी) शैक्षणिक संस्थांची विहित निकषांच्या आधारे निवड करून अशा संस्थांना प्रत्येकी रु. ३ कोटी इतके अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल.

२. शासनाकडून संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस एकूण रु. ३ कोटी एवढा निधी (बांधकामासाठी रु. २ कोटी व साहित्यसामुग्री व फर्निचरसाठी रु. १ कोटी) एकवेळचे अनुदान (one time grant) म्हणून उपलब्ध करुन दिले जाईल. निवडलेल्या संस्थेमार्फत स्थापित करण्यात येणाऱ्या व चालविण्यात येणारी तंत्रनिकेतने कायम विनाअनुदान तत्वावर मंजूर केली जातील. तसेच भविष्यात सदर तंत्रनिकेतन संस्था चालविण्यासाठी येणारा आवर्ती खर्च, (संस्थेचा दैनंदिन खर्च, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांवरील वेतन व भत्ते यावरील खर्च, परिरक्षेवरील खर्च इत्यादी) या तंत्रनिकेतन संस्थेमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकडून खाजगी तंत्रनिकेतन संस्थाकरिता शिक्षण शुल्क समितीकडून निर्धारित प्रशिक्षण शुल्कानुसार प्राप्त होणा-या निधीमधून संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेने भागवावयाचा आहे. या संस्थेस याकरिता शासनाकडून कोणत्याही प्रकारचे अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही. तसेच यामुळे संस्थेस भविष्यात शासनाकडून अनुदान मागणी करण्याचा कसलाही हक्क प्राप्त होणार नाही.

३. **प्रवेश क्षमता व आरक्षण** :- अशासकीय शैक्षणिक संस्थेकडून गरजेनुरुप निवडावयाच्या पदविका अभ्यासक्रमांकरिता प्रत्येक अभ्यासक्रमासाठी ६० विद्यार्थी याप्रमाणे पाच अभ्यासक्रमांसाठी एकूण ३०० विद्यार्थ्यांची प्रवेशक्षमता असलेले खाजगी तंत्रनिकेतन अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या (A.I.C.T.E.) मान्यतेने सुरु करण्यात येईल. एकूण प्रवेश क्षमतेच्या ७०% एवढया जागा अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता राखीव असतील, तर उर्वरित ३०% जागा शासनाच्या प्रचलित आरक्षणविषयक धोरणाचा अवलंब करुन बिगर-अल्पसंख्याक

विद्यार्थ्यांमधून भरण्यात येतील. प्रत्येक अभ्यासक्रमाच्या ६० जागांपैकी ७०% (४२ जागा) अल्पसंख्याक लोकसमूहनिहाय जागासाठीचे आरक्षण खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | अल्पसंख्याक लोकसमूह | जागा |
|---|---|---|
| १ | मुस्लिम | २२ |
| २ | बौध्द | १४ |
| ३ | ख्रिश्चन | २ |
| ४ | शीख | १ |
| ५ | जैन | २ |
| ६ | पारसी | १ |
| | एकूण | ४२ |

**४.** प्रवेश प्रक्रियेमध्ये एखाद्या अल्पसंख्याक समूहातील उमेदवार उपलब्ध न झाल्यास त्या अल्पसंख्याक समूहासाठीची जागा इतर अल्पसंख्याक समूहामधील गुणानुक्रमानुसार उपलब्ध उमेदवारांमधून भरण्यात येईल.

**५.** प्रवेश प्रक्रियेमध्ये मुलींसाठी ३०% जागा आरक्षित राहतील. एखाद्या अभ्यासक्रमांमध्ये मुलींसाठीच्या आरक्षणाचे प्रमण विहित मर्यादेनुसार होत नसल्यास या योजनेंतर्गत संस्थेच्या सर्व अभ्यासक्रमांसाठी मिळून होणाऱ्या एकूण मंजूर प्रवेश क्षमतेच्या ३०% जागा मुलींसाठी आरक्षित ठेवल्या जातील.

**६. खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्यास इच्छुक असलेल्या अशासकीय शैक्षणिक संस्थाची निवड पुढील निकषांच्या आधारे केली जाईल :-**

१. तंत्रनिकेतन संस्था चालू करण्यास इच्छुक असलेली अशासकीय संस्था संबंधित संविधीखाली नोंदणीकृत तथा शासन मान्यताप्राप्त असावी.

२. अशासकीय शैक्षणिक संस्थेस शिक्षण संस्था (उदा. माध्यमिक शाळा अथवा कनिष्ठ महाविद्यालय अथवा महाविद्यालय अथवा तंत्रनिकेतन / अभियांत्रिकी/ व्यासायिक शिक्षणाचे महाविद्यालये) चालविण्याचा किमान ५ वर्षांचा अनुभव असावा.

३. अशासकीय संस्थेकडे मुंबई येथे सुरु करावयाच्या तंत्र शिक्षण संस्थेसाठी १.५ एकर व भिवंडी आणि मालेगांव येथे सुरु करावयाच्या तंत्र शिक्षण संस्थांसाठी प्रत्येकी ५ एकर एवढी स्वतःच्या मालकी हक्काची व निर्विवाद स्वरुपाची (Undisputed) जमीन असावी. तसेच संबंधित अशासकीय संस्थेस शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय या इमारतीची कोणत्याही परिस्थितीत विल्हेवाट लावता येणार नाही किंवा तंत्रनिकेतनाव्यतिरिक्त अन्य उपक्रमांसाठी इमारतीचा वापर करता येणार नाही. संबंधित अशासकीय संस्थेस या इमारतीचा वापर इतर कारणांसाठी करता येणार नाही.

४. शासनाकडून उपलब्ध करुन दिल्या जावयाच्या अनुदानाव्यतिरिक्त संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेकडे तंत्रनिकेतन संस्था उभारण्यासाठी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकांनुसार पर्याप्त निधी उपलब्ध असणे आवश्यक आहे किंवा असा निधी उभारण्याची क्षमता असली पाहिजे. अशासकीय संस्थेच्या बँक खात्यात किमान रु. ५० लक्ष एवढा निधी जमा असणे आवश्यक आहे. याखेरीज संस्थेच्या संयुक्त नियत खात्यात (Joint Fixed Account) किमान रु. १५ लक्ष एवढी रक्कम असणे आवश्यक आहे.

५. खाजगी तंत्रनिकेतन संस्था दीर्घकाळ कार्यक्षमरित्या चालविण्याकरिता संबंधित अशासकीय संस्था आर्थिकदृष्टया सक्षम असावी.

६. अशासकीय संस्थेची निवड तंत्र शिक्षण क्षेत्रातील अनुभव,आर्थिक सक्षमता, स्वतःच्या मालकी हक्काची जमीन व इतर अनुषंगिक बाबींचा विचार करुन संपूर्णतः गुणवत्तेवर आधारित करण्यात येईल.

७. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्था कोणत्याही राजकीय गटाशी अथवा जातीय / सांप्रदायिकदृष्ट्या पूर्वग्रहदूषित संघटनेशी संबंधित नसावी.

<u>**योजनेची कार्यपध्दती**</u> :-

**७.** मालेगांव (जि. नाशिक), भिवंडी (जि. ठाणे) व मुंबई येथे तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्यासाठी शासनाकडून राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांमध्ये जाहिरात देण्यात येईल. त्यान्वये खाजगी तत्वावर तंत्रनिकेतन चालविण्याबाबत उच्च व तंत्र शिक्षण विभाग, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद (A.I.C.T.E.), संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य आणि महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांच्याकडून विहित करण्यात आलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणाऱ्या अशासकीय शैक्षणिक संस्थांकडून विहित नमुन्यात प्रस्ताव मागविण्यात येतील. अर्ज मागविण्यासाठी वृत्तपत्रांमध्ये जाहीरात प्रसिध्द करण्यात येईल.

**८.** अर्जासोबत संबधित अशासकीय शैक्षणिक संस्थेने खालील कागदपत्रांच्या प्रती जोडणे आवश्यक राहील.

१. रु. १००/- च्या अन्यायिक मुद्रांकावर (non-judicial stamp paper) नोटराइज्ड करुन सादर करावयाचे विहित नमुन्यातील प्रतिज्ञापत्र.

२. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत.

३. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेच्या अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची उपसंचालक, (तंत्रशिक्षण), तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी साक्षांकित केलेली छायाचित्रे तसेच संस्थेच्या सदस्यांची यादी.

४. संस्थेच्या मालकीहक्काच्या जमीन / मालमत्तेसंदर्भात पी. आर.कार्ड / गांव नमुना क्र. ७/१२ चा उतारा इ. च्या सत्यप्रती.

५. संस्थेचे मागील तीन वर्षांचे वार्षिक अहवाल / लेखा परिक्षण झालेले लेखे (ताळेबंद पत्रकासह).

६. संस्थेचे संस्थापन समयलेखे / पोटनियम / ट्रस्ट डीड इत्यादींच्या सत्यप्रती.

७. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस अशा स्वरुपाचे शैक्षणिक अभ्यासक्रम चालविण्याचा किमान ५ वर्षांचा अनुभव असल्याबाबत संबंधित सह संचालक, तंत्रशिक्षण यांनी दिलेला विहित नमुन्यातील दाखला तसेच संस्थेस शासन मान्यता असल्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत.

८. संबधित अशासकीय शैक्षणिक संस्था परिपूर्णरित्या भरलेले अर्ज आवश्यक त्या कागदपत्रांसह शासनाकडे विहित मुदतीत सादर करतील.

**९.** **अशासकीय शैक्षणिक संस्थांची निवड करण्यासाठी निवड समिती** :- तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्यासाठी संबंधित अशासकीय संस्थाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची विहित निकषांनुसार छाननी करणे व निवड करणे यासाठी समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग | - | अध्यक्ष |
| २.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | - | सदस्य |
| ३. प्रधान सचिव, नियोजन विभाग | - | सदस्य |
| ४. संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई | - | सदस्य |
| ५. सह संचालक, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, विभागीय कार्यालय, मुंबई | - | सदस्य |
| ६. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ | - | सदस्य |
| ७. सह सचिव/ उप सचिव अल्पसंख्याक विकास विभाग | - | सदस्य सचिव |

**१०.** निवड झालेल्या अशासकीय शैक्षणिक संस्थाना शासनाशी करार करणे आवश्यक राहील. कराराच्या अटी व शर्ती स्वतंत्रपणे विहित करण्यात येतील.

**११.** **अनुदान वितरण** :- करार झाल्यानंतर निवड समितीने छाननीअंती निवड केलेल्या अशासकीय शैक्षणिक संस्थांना प्रत्येकी तीन कोटी एवढे अनुदान पुढीलप्रमाणे चार टप्प्यांत वितरित केले जाईल.

१. निवड झालेल्या अशासकीय शैक्षणिक संस्थेने तंत्रनिकेतन संस्था सुरु करण्यासाठी केंद्र शासनाची (A.I.C.T.E.) आवश्यक परवानगी घेतल्यानंतर पहिल्या टप्प्यात रु. ५० लक्ष व तद्नंतर इमारतीचे चौथऱ्यापर्यंतचे (plinth level) बांधकाम पूर्ण केल्यानंतर दुसऱ्या टप्प्यात रुपये ५० लक्ष एवढे अनुदान संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस उपलब्ध करुन दिले जाईल.

२. बांधकामासाठी रु. ५० लक्ष व साधनसामुग्री व फर्निचर इत्यादींच्या खरेदीसाठी रु.५० लक्ष असे एकूण रु. १ कोटी एवढे अनुदान अभ्यासक्रमांचे पहिले वर्ष पूर्ण झाल्यानंतर तिसऱ्या टप्प्यात वितरित केले जाईल.

३. अनुदानाची उर्वरित रु. १ कोटी एवढी रक्कम (रु. ५० लाख बांधकामासाठी व रु. ५० लाख यंत्रसामुग्रीसाठी) अभ्यासक्रमांच्या पहिल्या तुकडीने यशस्वीरीत्या अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर शासनाकडून संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस अदा (release) केली जाईल.

**१२.** अनुदान वितरणाच्या प्रत्येक टप्प्याच्या शेवटी संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेने शासनाकडून प्राप्त झालेल्या अनुदानाच्या खर्चासंबंधातील लेख्यांचे मान्यताप्राप्त लेखापाल यांच्याकडून लेखापरिक्षण करून घेऊन परिक्षित लेख्यांचे विवरणपत्र तसेच या कालावधीतील भौतिक साध्यांचे (Physical achievements) विवरणपत्र अल्पसंख्याक विकास विभागास सादर करणे बंधनकारक आहे. परिक्षित लेख्यांचे विवरणपत्र (Audited statement of accounts) व भौतिक साध्यांबाबतचा प्रगती अहवाल सादर केल्यानंतर व योजनेच्या अंमलबजावणीसंदर्भात संबंधित संस्थेने समाधानकारक प्रगती केली असल्याची खात्री झाल्यानंतरच पुढील टप्प्यातील अनुदान मुक्त केले जाईल.

**१३.** **करारामधील अटींचा भंग केल्यास करावयाची कार्यवाही :-** खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्यासंदर्भात संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेने समाधानकारक प्रगती दाखविली नसेल किंवा कोणत्याही विहित अटीचा भंग होत असेल तर, शासनास एकतर संस्थेच्या व्यवस्थापनासाठी सुयोग्य पर्यायी व्यवस्था करण्याचा किंवा संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस उपलब्ध करुन देण्यात आलेले अनुदान द.सा.द.शे. १२% या व्याजदराने वसूल करण्याचा अधिकार असेल. सदरील अटींचा समावेश संस्थेसोबत करावयाच्या करारनाम्यामध्ये केला जाईल.

**१४.** संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेच्या लेख्यांची वेळोवेळी तपासणी करण्याचा अधिकार मंजूरी प्राधिकरण म्हणजे अल्पसंख्याक विकास विभागास असेल, तसेच महालेखापाल, महाराष्ट्र राज्य यांच्याकडून लेखापरिक्षण करवून घेण्याचा अधिकार देखील शासनास असेल.

**१५.** तंत्र शिक्षण संस्था चालविण्याकरिता निवड झालेल्या अशासकीय संस्थांनी उच्च व तंत्र शिक्षण विभाग, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद (A.I.C.T.E.), संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य व महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून वेळोवेळी विहित केलेल्या किंवा भविष्यात केल्या जाणाऱ्या सर्व नियम / अटी व शर्तींचे पालन करणे आवश्यक राहील. विद्यार्थ्यांच्या प्रवेश प्रक्रियेसह अल्पसंख्याक विकास विभागाच्या अटी व करारपत्रक

संस्थेवर बंधनकारक राहील. संबंधित तंत्रनिकेतन संस्थेचे व्यवस्थापन करणाऱ्या समितीवर सहसंचालक (तंत्रशिक्षण), तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे पदसिध्द सदस्य म्हणून काम पाहतील.

**१६.** या योजनेसाठी लेखाशिर्ष व अनुदान वितरणाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील

**१७** हे आदेश नियोजन विभाग, वित्त विभाग आणि उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५३/व्यय-४ दि.२९/१/२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**१८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२०५१७०११२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

**( उ. सं. दांडेकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
विभागीय आयुक्त, नाशिक, ठाणे व मुंबई
जिल्हाधिकारी, नाशिक, ठाणे व मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, ठाणे व मुंबई
संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई,
संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ,
सह संचालक, अखिल भारतीय तंत्र शिक्षण मंडळ विभागीय कार्यालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
सह संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय (सर्व)

**अल्पसंख्याक विकास विभाग, महाराष्ट्र शासन**
**(राज्यातील अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्याबाबतची योजना)**

## अर्जाचा नमूना

**१.** अर्जदार अशासकीय शैक्षणिक संस्थेचे नांव व पत्ताः-
नाव-..........................................................................................
पत्ता-.........................................................................................
..........................................पिन कोड :-...............................
दुरध्वनी क्र. :-...................................
ई-मेल पत्ता :-...................................
फॅक्स क्र. :-...................................

**२.** अर्जदार संस्थेच्या अध्यक्षांचे पूर्ण नांव व पत्ताः-
नांव-.........................................................................................
पत्ता-.........................................................................................
...........................................पिन कोड :-..............................
दुरध्वनी क्र. व भ्रमण दुरध्वनी क्र. :-...................................

**३.** अर्जदार संस्थेच्या सचिवांचे पूर्ण नांव व पत्ताः-
नांव-.........................................................................................
पत्ता-.........................................................................................
...........................................पिन कोड :-..............................
दुरध्वनी क्र. व भ्रमण दुरध्वनी क्र. :-...................................

**४.** अर्जदार अशासकीय शैक्षणिक संस्थेचा तपशीलः-
अ) संस्थेची संस्था नोंदणी अधिनियम, १८६०/
मुंबई सार्वजनिक न्यास नोंदणी अधिनियम ,१९५०/
वक्फ अधिनियम / इतर संबंधित संविधी अंतर्गत ..................................................
नोंदणी झाल्याचा दिनांक, क्रमांक व नोंदणीचे स्थळ
ब) संस्थेस धर्मादाय आयुक्तांकडून प्राप्त झालेला
नोंदणी क्रमांक, दिनांक व स्थळ .......................................................
(अर्जदार संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्राच्या साक्षांकित
प्रतीसह संस्थेची घटना, संस्थापन समयलेख
अथवा न्यासविलेखाची साक्षांकित प्रत सोबत जोडावी.)

क) अर्जदार संस्थेस शैक्षणिक अभ्यासक्रम / संस्था
चालविण्याचा अनुभव आहे का ? असल्यास
किती वर्षांचा :- .................................................

**५.** धर्मादाय आयुक्तांनी मान्यता दिलेल्या संस्थेच्या सदस्यांचा / विश्वस्तांचा तपशील:-

| अ.क्र. | संस्थेच्या सदस्य / विश्वस्तांचे नांव | संस्थेत धारण करत असलेले पद | शैक्षणिक पार्श्वभूमी | निवासी दुरध्वनी क्र. / भ्रमण दुरध्वनी क्र. |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |
| ६ | | | | |
| ७ | | | | |
| ८ | | | | |
| ९ | | | | |
| १० | | | | |

**६.** प्रस्तावित तंत्रनिकेतन संस्था ज्या ठिकाणी उभारण्यात येणार आहे त्या स्थळाचा तपशील:-

अ) तंत्रनिकेतन संस्था उभारण्यासाठी अर्जदार
संस्थेकडे उपलब्ध असलेल्या मालकी हक्काच्या
व निर्विवाद स्वरुपाच्या जमिनीचे एकूण क्षेत्रफळ:-.................................................
(७/१२ चा उतारा व जमिनीचे कागदपत्र जोडावेत)

ब) जमिनीचा सर्व्हे क्रमांक :- .................................................

क) गांव / शहर :-..............................................
ड) पिन कोड क्रमांक :-..............................................

इ) संस्थेकडे उपलब्ध असलेली जमीन
बिनशेती प्रकारची आहे का ? असल्यास,
संबंधित प्राधिकारी यांचे नांव व मान्यतेचा
दिनांक :-..............................................
(जमीन बिनशेती असल्याबाबतच्या आदेशाची प्रत जोडावी)

**७.** अर्जदार संस्था सुरु करणार असलेले प्रस्तावित तंत्रनिकेतन अभ्यासक्रमः-

| तंत्रनिकेतन अभ्यासक्रमाचे नांव | अभ्यासक्रमाचा कालावधी | प्रवेशासाठी किमान अर्हता |
|---|---|---|
| | | |

**८.** तांत्रिक / व्यवसायिक अथवा अव्यवसायिक शैक्षणिक संस्थेचे संचलन / व्यवस्थापन करण्यासंदर्भात अर्जदार संस्थेकडे असलेला पुर्वानुभव :-

| अभ्यासक्रम संस्थेचे नांव व पत्ता | पदविका / पदवी (UG/PG) | अभ्याक्रमाचा कालावधी | चालविण्यात येणारे अभ्यासक्रम | वार्षिक प्रवेशक्षमता | स्थापनेचे वर्ष | अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद/विद्यापीठ/ राज्य शासन/शैक्षणिक मंडळ/इतर परिषदेद्वारे मान्यता प्राप्त आहे किंवा कसे |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |

**९.** अर्जदार संस्थेच्या बँकेत असलेल्या निधीचा तपशीलः-

| निधी | बँकेचे नांव | खाते क्रमांक | रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| नियत ठेव | | | |
| बचत खाते | | | |
| चालू खाते | | | |

(गेल्या एका वर्षातील पासबुक व्यवहाराच्या तपशीलाची छायांकीत प्रत जोडावी)

**१०.** अर्जदार संस्थेच्या लेख्यांचे लेखापरिक्षण झाले आहे किंवा कसे :- (होय) / (नाही)
(गेल्या तीन वर्षांच्या लेखा परिक्षणाच्या छायांकीत प्रती जोडाव्यात)

**११.** संस्थेने आयकर विवरणपत्र दाखल केले आहे किंवा कसे :- (होय) / (नाही)
(संस्थेने सर्वात शेवटी दाखल केलेल्या आयकर विवरणपत्राची छायांकीत प्रत जोडावी)

**१२.** प्रस्तावाच्या पुष्टयर्थ अर्जदार संस्था देऊ इच्छित असलेला अन्य तपशील :-

**प्रतिज्ञापत्र**

मी / आम्ही ............................................................... या अशासकीय शैक्षणिक संस्थेच्या वतीने हमी देतो की, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने तसेच तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी तंत्रनिकेतन संस्था संचलित व प्रशासित करण्यासंदर्भात विहित केलेल्या मानकांचे आणि अटी व शर्तीचे आमची संस्था विनिर्देशपुर्वक पालन करेल. मी / आम्ही असेही प्रतिपादन करतो की, तंत्रनिकेतन संस्था सुरु करण्यासाठी आवश्यक असलेले इरादापत्र मिळण्यासाठी विहित मुदतीत आवश्यक त्या सर्व कागदपत्रांची पूर्तता करण्यात येईल. अन्यथा आमच्या संस्थेचा प्रस्ताव निवड समितीकडून नाकारला जाईल याची मला / आम्हाला जाणीव आहे.अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.२२२/०९/का.७, दिनांक ५ फेब्रुवारी, २०१० अन्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दती व सर्व अटींचे पालन करण्यास माझी / आमची सहमती आहे.

मी / आम्ही याद्वारे अशीही पुष्टी देतो की, अर्जात दिलेली सर्व माहिती आमच्या माहितीनुसार व समजुतीप्रमाणे सत्य व बरोबर आहे. अर्जातील माहिती असत्य अथवा चुकीची आढळल्यास आमचा प्रस्ताव नाकारला जाऊ शकतो याची आम्हाला कल्पना आहे.

सही

ठिकाण- नाव-..................................................
दिनांक- पदनाम...............................................

(शिक्का)

**अर्जासोबत जोडावयाच्या कागदपत्रांची सूची :-**

१. रु. १००/- च्या अन्यायिक मुद्रांकावर (non-judicial stamp paper) नोटराइज्ड करुन सादर करावयाचे विहित नमुन्यातील प्रतिज्ञापत्र.
२. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेच्या नोंदणी प्रमाणपत्राची सत्यप्रत.
३. संस्थेच्या मालकीहक्काच्या जमीन / मालमत्तेसंदर्भात पी. आर.कार्ड / गांव नमुना क्र. ७/१२ चा उतारा इ. च्या सत्यप्रती.
४. जमीन बिनशेती असल्याबाबतच्या आदेशाची सत्यप्रत
५. संस्थेचे मागील तीन वर्षांचे वार्षिक अहवाल / लेखा परिक्षण झालेले लेखे (ताळेबंद पत्रकासह).
६. संस्थेने नजिकच्या काळात दाखल केलेल्या आयकर विवरणपत्राची सत्यप्रत
७. संस्थेचे संस्थापन समयलेखे / पोटनियम / ट्रस्ट डीड इत्यादींच्या सत्यप्रती.
८. संबंधित अशासकीय शैक्षणिक संस्थेस अशा स्वरुपाचे शैक्षणिक अभ्यासक्रम चालविण्याचा किमान ५ वर्षांचा अनुभव असल्याबाबत संबंधित सह संचालक, तंत्रशिक्षण यांनी दिलेला विहित नमुन्यातील दाखला तसेच संस्थेस शासन मान्यता असल्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत.

**(राज्यातील अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्याबाबतची योजना)**

रु.१००/- च्या नॉन ज्युडिशियल स्टँम्प पेपरवर करावयाचे शपथपत्र

मी/आम्ही श्री./श्रीमती.....................................................................व श्री./श्रीमती ............. ..........................................असे प्रमाणित करतो की, आमच्या .................................................. ..... .. .संस्थेने मालेगांव (जि. नाशिक)/ भिवंडी(जि.ठाणे) / मुंबई येथे अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्याबाबतच्या अल्पसंख्याक विकास विभागाच्या योजनेंतर्गत विहित नमुन्यातील अर्ज आवश्यक त्या सर्व कागदपत्रांसह सादर केला आहे. सदर अर्जामध्ये दिलेल्या सर्व माहितीची मी / आम्ही पडताळणी केली असून सर्व माहिती सत्य व बरोबर आहे.

मी / आम्ही असे प्रतिपादन करतो की, नवीन खाजगी तंत्रनिकेतन संस्था स्थापन करण्यासाठी शासनाकडून उपलब्ध होणारा निधी योग्यरित्या वापरला जाईल. सदर निधीचा गैरवापर झाल्यास अथवा अर्जातील माहिती असत्य आढळून आल्यास अथवा करारामधील अटीचा भंग केल्यास सदर योजनेच्या शासन निर्णयान्वये विहित केल्यानुसार आमच्या विरुध्द / संस्थेविरुध्द कार्यवाही केली जाईल याची मला / आम्हाला पूर्ण जाणीव आहे. तसेच मी / आम्ही असेही प्रतिपादन करतो की, सदर योजनेंतर्गत शासन वेळोवेळी ठरवेल किंवा सुधारणा करेल त्या अटी व शर्ती आम्हास / संस्थेस बंधनकारक असतील.

सही -
नांव - १)
२)
हुद्दा - सचिव अध्यक्ष

शिक्का -